**सन २०१५-२०१६ वर्षातील चुकीच्या नोंदीचे दुरूस्ती प्रस्ताव महालेखापाल कार्यालयास सादर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः एनओई-२०१६/प्र.क्र.६६/अर्थ-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ५ जानेवारी, २०१७

वाचा -

१) **शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांकः आरसीएन-२००५/ प्र.क्र.२/ अर्थ -५ दिनांक ५ जानेवारी २००५**
२) **शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांकः आरसीएन-२००५/ ३३ (३)/ अर्थ -५ दिनांक ३० मे २००५**
३) **महालेखाकार, (लेखा व हकदारी)-१, महाराष्ट्र, मुबंई यांचेकडील पत्र क्रमांकः व्हि.एल.सी./ (एपीपीएन)/ए/सीएस/ २०१५-२०१६/ ६०३, दि. १६ नोव्हेंबर, २०१६.**

शासन परिपत्रक -

मंजूर / वितरीत आर्थिक तरतूदीपेक्षा कमी/ अधिक खर्च झाल्यास त्याची कारणे महालेखापाल व लोकलेखा समितीस सादर करावी लागतात. ब-याचवेळी मंजूर तरतूदीएवढाच खर्च होऊनही खर्चाच्या नोंदी चुकीच्या झाल्यामुळे खर्च कमी/अधिक झाल्याचे दिसते. अशा चुकीच्या नोंदीसंदर्भात वेळीच कार्यवाही करणे आवश्यक ठरते परंतु अशा प्रकारची कार्यवाही वेळीच न केल्यामुळे लोकलेखा समितीसमोर होणा-या साक्षीच्या वेळेस मा.प्रधान सचिव व इतर वरिष्ठ अधिका-यांना स्पष्टीकरण देताना अडचणी निर्माण होतात. परिणामी, संबंधित क्षेत्रिय अधिका-यांविरुध्द शिस्तभंगाची कारवाई करावी लागते.

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२ नागपूर यांनी विनियोजन लेखा २०१५-२०१६ मध्ये संबंधित यंत्रणेकडून फार मोठ्या प्रमाणावर अनुदानापेक्षा जास्त/कमी खर्च दर्शविलेला आहे. याचे एक कारण खर्चमेळ करताना बहुतांशी लेखाशीर्षांतर्गत निदर्शनास आलेल्या चुकीच्या नोंदी हया असून त्याबाबतच्या दुरूस्तीचे प्रस्ताव सादर करणे आवश्यक आहे. वित्त विभाग परिपत्रक क्रमांक आरसीएन-१०९४/प्र. क्र.४५/९४/ लेखापरीक्षा दिनांक २२.०४.१९९४ नुसार महालेखापालांनी शासनास विनियोजन लेखे पाठविल्यानंतर सहा महिन्यांच्या आत म्हणजे **दिनांक ३०** मार्च**, २०१७** पूर्वी महालेखापाल कार्यालयास चुकीच्या नोंदीचे प्रस्ताव शासनामार्फत सादर करणे आवश्यक आहे. ही कालमर्यादा पाळण्यासाठी सन २०१५-२०१६ या वर्षातील प्रलंबित असलेले चुकीच्या नोंदीचे दुरूस्ती प्रस्ताव शासनास **दिनांक २८** फेब्रुवारी**,२०१७** पर्यन्त सादर करावेत. जेणे करुन सदर चुकीच्या नोंदीच्या दुरुस्ती प्रस्तावांची पडताळणी करुन महालेखापालांकडे विहीत मुदतीत पाठविणे शासनास शक्य होईल.

**३. असे प्रस्ताव शासनास सादर करतांना संबंधित अधिकारी/यंत्रणेने खालील बाबी लक्षात घ्याव्यात.**

१ चुकीच्या नोंदीचा प्रत्येक स्वतंत्र दुरूस्ती प्रस्ताव वरील मुदतीच्या आत म्हणजेच **२८ फेब्रुवारी, २०१७** पूर्वी शासनास सादर करावा. याबाबत अधीक्षक अभियंता, कार्यकारी अभियंता व विभागीय लेखापाल यांनी व्यक्तिशः विशेष लक्ष द्यावे.

२ चुकीच्या नोंदीच्या दुरूस्ती प्रस्तावात दाखविण्यात आलेली रक्कम पूर्ण राशीत असावी, (उदा.लाख, कोटी, हजारात )

३ चुकीच्या नोंदीच्या दुरूस्ती प्रस्तावाच्या समर्थनार्थ महालेखापाल कार्यालयांनी प्रमाणित केलेल्या खर्चमेळाच्या प्रती जोडण्यात याव्यात.

४ चुकीच्या नोंदीचा दुरूस्ती प्रस्ताव सादर करताना खर्चाचे संपूर्ण विवरण अर्थसंकल्पानुसार करावे. (उदा.मागणी क्रमांक, योजनांतर्गत/योजनेत्तर, भारीत, दत्तमत, संगणक संकेतांक, आदिवासी/बिगर आदिवासी इत्यादीचा उल्लेख करावा.

५ चुकीच्या नोंदीचा दुरूस्ती प्रस्ताव एकापेक्षा अधिक विभागाशी संबंधीत असेल तर ही बाब संबंधित विभागाच्या वेळीच निदर्शनास आणून त्या विभागाची सहमती घ्यावी व त्याची प्रत संबंधित प्रशासकीय विभागप्रमुख (मंत्रालय) व महालेखापाल कार्यालयास पृष्ठांकित करावी.

६ सार्वजनिक बांधकाम विभागाच्या योजनेव्यतिरिक्त इतर कामांसाठी इतर विभागाकडून अनुदान मंजूर झाले असेल त्या लेखाशिर्षाखालील चुकीच्या नोंदीचा दुरूस्ती प्रस्ताव त्या संबंधित प्रशासकीय विभागामार्फत परस्पर महालेखापालांकडे पाठवून त्याची एक प्रत सार्वजनिक बांधकाम विभागास सादर करावी. सदर प्रस्तावाबाबत संबंधित विभागाकडे पाठपुरावा करण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रीय/नियंत्रक अधिका-यांची (कार्यकारी अभियंता/अधीक्षक अभियंता यांची) राहील.

७ चुकीच्या नोंदीच्या दुरुस्ती प्रस्तावाची शासनाकडून महालेखापाल कार्यालयास शिफारस केल्यानंतर महालेखापालाकडून प्रस्ताव मंजूर होईपर्यन्त क्षेत्रिय व नियंत्रक अधिका-याने शासनाच्या वतीने सातत्याने महालेखापालांकडे पाठपुरावा करावा. याप्रकरणी विभागीय लेखा अधिकारी जबाबदार राहतील.

८ सार्वजनिक बांधकाम विभागाशी संबंधित असलेले चुकीच्या नोंदीचे दुरूस्ती प्रस्ताव शासनाकडे कोणत्याही परिस्थितीत दिनांक २८ फेब्रुवारी, २०१७ पूर्वी पाठविण्याची जबाबदारी संबंधित कार्यकारी अभियंता व **नियंत्रक अधिकारी म्हणून** अधीक्षक अभियंता **यांची राहील. त्यानंतर आलेले प्रस्ताव विचारात घेतले जाणार** नाहीत व त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

९ विभागीय अधिकारी व नियंत्रक अधिकारी यांनी ज्या लेखा शिर्षाखालीअनुदान मंजूर आहे त्याच लेखाशिर्षाखाली विभागाने खर्च नोंदविलेला आहे व महालेखापालांनाही त्याच लेखाशिर्षाखाली खर्च नोंदविला आहे याची खात्री करावी. तफावती आढळून आल्यास चुकीच्या नोंदीचे दुरूस्ती प्रस्ताव सादर करावेत.

४. सर्व मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता / कार्यकारी अभियंता यांना अशा सूचना देण्यात येत आहेत की, ज्यावेळी शासन स्तरावरून वार्षिक पुनर्विलोकन करण्यात येईल त्यावेळी काही त्रुटी निदर्शनास आल्यास संबंधित **अधीक्षक अभियंता / कार्यकारी अभियंता / विभागीय लेखापाल /अर्थ लिपिक यांना जबाबदार धरून त्यांच्याविरूध्द खर्चमेळाच्या कामामध्ये दाखविण्यात येणारी अकार्यक्षमता व अनास्था या कारणास्तव शासनस्तरावरून विभागीय चौकशी प्रस्तावित करण्यात येईल.** याबाबत जरी महालेखापाल कार्यालयाकडून

चुकीने/ अनावधानाने खर्च दुस-या लेखाशिर्षात दाखविल्याचे निदर्शनास आले तरी संबंधित कार्यालयाने ही बाब चुकीच्या नोंदीच्या दुरूस्तीच्या प्रस्तावाद्वारे योग्य कालावधीमध्ये महालेखापाल कार्यालयाच्या निदर्शनास आणून आवश्यक ती दुरूस्ती विहित मुदतीत करण्याची जबाबदारी संबंधित अधीक्षक अभियंता यांची राहील. **आपआपल्या प्रादेशिक विभागातील चुकीच्या नोंदीचे दुरूस्ती (Note of Error) प्रस्ताव महालेखापालांकडे विहित मुदतीत पाठविले जातील याची दक्षता संबंधित मुख्य अभियंता यांनी दरवर्षी न चुकता वेळेतच घ्यावी.**

५. विनियोजन लेख्यावरील खर्चमेळाबाबत चुकीच्या नोंदीचे दुरूस्ती प्रस्ताव वेळेवर महालेखापाल कार्यालयास न पाठविल्यामुळे प्रशासकीय विभागाचे प्रमुख म्हणून विभागाच्या सचिवांना चुकीच्या नोंदी दुरूस्ती प्रस्तावासंदर्भात कार्यकारी अभियंता/ अधीक्षक अभियंता यांनी दाखवलेल्या अनास्थेमुळे अनेकदा विधिमंडळ समितीसमोर साक्षीच्या वेळेस विश्लेषण /स्पष्टीकरण करणे अवघड जाते. ज्या प्रकरणामध्ये चुकीच्या नोंदीचे प्रस्ताव विहित मुदतीमध्ये महालेखापाल कार्यालयाला पाठविले जाणार नाहीत अशा सर्व प्रकरणी **संबंधित अधीक्षक अभियंता / कार्यकारी अभियंता / विभागीय लेखापाल /संबंधित अर्थ लिपिक यांच्यावर महाराष्ट्र नागरी सेवा वर्तणूक नियम १९७९ अन्वये जबाबदारी निश्चित करण्याची/ प्रस्तावित करण्याची जबाबदारी संबंधित मुख्य अभियंता यांची असेल.**

६. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) १ व २, महाराष्ट्र राज्य, मुबंई/नागपूर व शासनाच्या वित्त विभागाकडून दरवर्षी चुकीच्या नोंदीचे दुरूस्ती प्रस्ताव प्रशासकीय विभागाकडून विहित मुदतीत सादर करण्यासंबंधी निर्देश दिले जातात. तथापि, यावर अधीक्षक अभियंता/ कार्यकारी अभियंता यांचेकडून वेळेत कार्यवाही केली जात नाही, असे आतापर्यंत निदर्शनास आलेले आहे. तरी यापुढे "चुकीचे नोंद दुरूस्ती प्रस्ताव" विहित मुदतीत न गेल्यास संबंधितांवर वरील परिच्छेदामध्ये निर्देशिल्याप्रमाणे कार्यवाही केली जाईल याचा पुनरूच्चार करण्यात येत आहे. यास्तव सदर परिपत्रकातील उपरोक्त परिच्छेदात नमूद सूचना/ निर्देश यांचे संबंधित क्षेत्रिय अधिकारी व नियंत्रक अधिकारी ( कार्यकारी अभियंता व अधीक्षक अभियंता) यांनी काटेकोरपणे पालन करण्याची खबरदारी घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र. २०१७०१०५१५०७०७२३१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Fulchand Sakharam Meshram

Digitally signed by Fulchand Sakharam Meshram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Fulchand Sakharam Meshram
Date: 2017.01.05 15:11:31 +05'30'

**( फु.स.मेश्राम )**
आंतर वित्तिय सल्लागार व उपसचिव , महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल - (लेखा व अनुज्ञेयता) - १ व २, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

२. मा. प्रधान सचिव, सा.बां.वि. यांचे स्विय सहाय्यक, मुंबई
३. मा. सचिव ( इमारती ) यांचे स्वीय सहाय्यक , मुंबई
४. मा. सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक , मुंबई
५. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील सर्व मुख्य अभिंयता ( विद्युतसह )
६. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील सर्व अधीक्षक अभियंता ( विद्युतसह )
७. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई ४००००१.
८. संचालक, उपवने व उद्याने संचालनालय, मुंबई- ४००००१.
९. किनारी अभियंता, महाराष्ट्र राज्य, मुंबई .
१०. अवर सचिव, वित्त विभाग/ग्राम विकास विभाग/आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई ४०००३२.
११. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यकारी अभियंता (विद्युतसह)
१२. अवर सचिव (अर्थ) / विशेष अधिकारी (लेखापरीक्षा) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१३. लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, महाराष्ट्र शासन, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०००५१
१४. कार्यासन अधिकारी (अर्थ-१,अर्थ-२,अर्थ-३,रोख शाखा) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१५. कार्यासन अधिकारी (कार्यासन अर्थ-५) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय (निवडनस्ती)